**आषाढीवारी- २०२५**

आषाढी एकादशी निमित्त अहिल्यानगर जिल्ह्यातून मार्गस्थ पालख्यांसोबत असलेल्या **वारकऱ्यांना** तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर सुविधा पुरविण्याच्या कामांना निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः तीर्थवि-२०२५/ई-११५५०६०/यो-११**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई - ४००००१

**दिनांक: ११ जून, २०२५**

**संदर्भ:-**

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परषिद, अहिल्यानगर यांचे पत्र जा.क्र./ग्रापं-०६/ /२०२५ दि.२९.०५.२०२५.

**प्रस्तावना :-**

आषाढी वारी २०२५ सोहळ्याच्या अनुषंगाने अहिल्यानगर जिल्ह्यातून मार्गस्थ होणाऱ्या संत श्री एकनाथ महाराज पालखी (पैठण), श्री संत निळोबाराय महाराज पालखी, पिंपळनेर व इतर पालख्यांसोबत असणाऱ्या वारकऱ्यांना तात्पुरते शौचालय, स्नानगृहे, पिण्याचे पाणी व आवश्यक सोयी-सुविधा पुरविण्यासाठी संदर्भीय पत्रान्वये जिल्हा परिषद, अहिल्यानगर यांनी आवश्यक निधी उपलब्ध करुन देणेबाबत विनंती केली आहे. त्यानुसार जिल्हा परिषद, अहिल्यानगर यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सदर अर्थसंकल्पीत तरतूदीमधून, आषाढी एकादशीनिमित्त अहिल्यानगर जिल्ह्यातून मार्गस्थ होणाऱ्या संत श्री एकनाथ महाराज पालखी (पैठण), श्री संत निळोबाराय महाराज पालखी, पिंपळनेर व इतर पालख्यांसोबत असणाऱ्या वारकऱ्यांना तात्पुरते शौचालय, स्नानगृहे, पिण्याचे पाणी आवश्यक सोयी-सुविधा पुरविण्यासाठी जिल्हा परिषद, अहिल्यानगर यांनी **रु. २,६१,८०,०००/- (रुपये दोन कोटी एकसष्ट लक्ष ऐंशी हजार फक्त)** इतक्या निधीची मागणी केली आहे. सदर मागणीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | जिल्हा परिषद | कामांचे नाव | रक्कम (रु.) |
|---|---|---|---|
| १. | जिल्हा परिषद, अहिल्यानगर | १. वाटरप्रुफ मंडप उभारणे | १,०५,००,०००/- |
| | | २. फिरते तात्पुरते शौचालय | ३५,००,०००/- |
| | | ३. स्नानगृहे | ५५,००,०००/- |
| | | ४. पिण्याचे पाणी सुविधा | ३,८०,०००/- |
| | | ५. वैद्यकीय सुविधा, औषध पुरविणे | २१,००,०००/- |
| | | ६. ग्रामपंचायत सहाय्य अनुदान | ४२,००,०००/- |
| | | **एकूण** | **२,६१,८०,०००/-** |

२. सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास या योजनेंतर्गत, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजना (कार्यक्रम) (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२५१५ २५२१) या लेखाशीर्षाखाली रु.१००.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

३. सद्यस्थितीत २५१५ २५२१ लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतुदीतून मंजूर **रु. २,६१,८०,०००/-** इतक्या रकमेच्या ७५ % म्हणजेच **रु. १,९६,३५,०००/- (रु. एक कोटी शह्याण्णव लक्ष पस्तीस हजार फक्त)** इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहिल्यानगर यांना वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर निधी वितरीत करताना, ज्या कामांसाठी निधी उपलब्ध करून दिलेला आहे त्याच कामांवर खर्च करण्याची जबाबतदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, आहिल्यानगर यांची राहील. सदर सहायक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई व या विभागास सादर करावीत. वितरीत निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व निर्मलवारीत (तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर सुविधा) या बाबीवर झालेल्या एकूण खर्चाचा सविस्तर तपशील शासनास सादर केल्यानंतर उर्वरित निधीचे वितरण करण्यात येईल.

५. सदर खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६, जिल्हापरिषदांना/जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय्य-(००) (०७) पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजना (कार्यक्रम) (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षात खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३२२/२०२५/व्यय-१५ दि. २९.०४.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७ एप्रिल, २०२५ अन्वये अटींची व शर्तीचे पालन करून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१११११२५५३७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701FC3DB9C38A46F4CD82E1E450B51A9E92EEDE8C323934F82EDB538D3B20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2025.06.11 17:10:01 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, यांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. मा. उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

५. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,

६. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,

८. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,

९. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, नाशिक विभाग, नाशिक,

१०.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अहिल्यानगर,

११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहिल्यानगर,

१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, अहिल्यानगर,

१३. जिल्हा कोषागार अधिकारी, अहिल्यानगर,

१४. अवर सचिव नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२,

१५. अवर सचिव वित्त विभाग (व्यय १५,अर्थसं १६,अर्थसं १७) मंत्रालय, मुंबई ३२,

१६.कार्यासन क्र. वित्त-१, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१७.निवड नस्ती (का.यो-११).